ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी करण्यात येणाऱ्या विकास कामांच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.
महादेव मंदिर देवस्थान धामणगाव, ता.आष्टी, जि.बीड.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२४/प्र.क्र.३०/यो-११**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
**दिनांक: १५ मार्च, २०२४**

**संदर्भ:-** १) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीर्थवि-२०११/प्र.क्र.६५१/योजना-६ दि. १६ नोव्हेंबर, २०१२.
२) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीर्थवि-२०२३/प्र.क्र.३६८/योजना-११ दि. २८ डिसेंबर, २०२३.

**प्रस्तावना:-**

ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेंतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांचेकडून “ब” वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी विविध विकास कामांकरीता निधी उपलब्ध करुन देणेबाबत विनंती करण्यात आली आहे. सदर “ब” वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्रांचे प्रस्ताव मा. प्रधान सचिव (ग्रामविकास) यांच्या अध्यक्षतेखालील राज्य निकष समितीसमोर दि.१५ जानेवारी,२०२४ व दि.६ मार्च, २०२४ रोजी झालेल्या बैठकीत सादर करण्यात आले. सदर बैठकीत खालील “ब” वर्ग तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी करावयाच्या कामांची अंदाजपत्रके व इतर कागदपत्रांची समितीने तपासणी केली व सदर कामांकरीता निधीची शिफारस केली आहे. त्यानुसार सदर “ब” वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी करावयाच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) ३१ सहायक अनुदान या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात एकूण रु.१५०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीतून खालील "ब" वर्ग तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी एकूण **रु.२००.०० लक्ष (रुपये दोनशे लक्ष फक्त)** एवढया रक्कमेच्या विकास कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| अ. क्र | तीर्थक्षेत्राचे नाव | कामांचे नाव | अंदाजपत्रकीय रक्कम | प्रशासकीय मान्यता रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | **महादेव मंदिर देवस्थान धामणगाव, ता.आष्टी, जि.बीड.** | १. संरक्षण भिंत बांधकाम करणे | ५९.०० | ५९.०० |
| | | २. काँक्रीट रोड बांधकाम करणे | १५.९० | १५.९० |
| | | ३. पोहच रस्ता करणे | ५६.७० | ५६.७० |
| | | ४. भक्त निवास बांधकाम करणे | ६८.४० | ६८.४० |
| | | **एकूण** | **२००.००** | **२००.००** |

२. वरील कामांच्या प्रशासकीय मान्यतेच्या रक्कमेच्या **१०% इतका निधी म्हणजेच रु.२०.०० लक्ष इतका निधी प्रथम टप्प्यात वितरीत** करण्यात येत आहे. प्रथम टप्प्यात वितरीत निधी खर्च केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व कामांची प्रगती शासनास सादर केल्यानंतरच उर्वरित निधी टप्प्याटप्प्याने वितरित करण्यात येईल.

३. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक मंजूरी (Sanctioned) असल्याची खात्री करावी. तसेच, सदरहू जागा वन विभागाच्या अखत्यारीत नसल्याचे खात्री करून बांधकामासाठी लागणारी आवश्यक जागा ग्रामपंचायतीच्या मालकीची आहे याची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी खात्री करावी.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी सदर अनुदान वरील कामावरच खर्च करावे. सदर अनुदान **दिनांक ३१ मार्च, २०२५** पूर्वी खर्च होणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने पुढील कार्यवाही करावी.

५. मंजूर निधीचा योग्यरितीने विनियोग होण्याच्या दृष्टीने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी दक्षता घ्यावी. सदर कामांचा त्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामावर देखरेख ठेवावी व कामांची माहिती उपयोगिता प्रमाणपत्रासह विहित मुदतीत सादर करावी.

६. सदर तीर्थक्षेत्र विकासाचे काम इतर कोणत्याही योजनेतून घेण्यात आलेले नाही याची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी खात्री करावी. तसेच, ग्रामविकास विभागाने ब वर्ग तीर्थक्षेत्र विकास योजनेत या तीर्थक्षेत्राच्या ठिकाणच्या कामांना यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिली असल्यास ती रक्कम व नवीन प्रशासकीय मान्यता रक्कम मिळून एकूण रु.५.०० कोटीच्या मर्यादेत प्रस्ताव असावा याबाबतची दक्षता प्रकरणपरत्वे संबंधीत कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद / सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी घ्यावी.

७. विकास कामे पूर्ण झाल्यानंतर सदरहू काम तीर्थक्षेत्र विकास योजनेतून घेण्यात आल्याचा नामफलक कामाच्या ठिकाणी ठळकपणे दिसेल असा लावण्यात यावा.

८. राज्य शासनामार्फत वेळावेळी प्रस्तुत योजनेविषयी व वित्त विषयक वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले आदेश/नियम/शासन निर्णय/वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी जिल्हा परिषद, बीड यांनी करावी. या अटीच्या अधीन सदर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

९. सदर निधी नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.८२/१४४४ दि.१६/०२/२०२४ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.१८०/२०२४/व्यय-१५ दि.२३/०२/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार वितरीत करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३ अन्वये अटीची व शर्तीची पूर्तता करून निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर अनुदान मागणी क्र.एल.०३, २५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम (००) (०८) ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (राज्यस्तर) (२५१५ २५६६) (योजनांतर्गत दत्तमत ३१ सहायक अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

११. सदर वितरण सुधारित मासिक विवरणपत्राच्या मर्यादेत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२००३४७१९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.03.16 01:44:51 +05'30'

**( का.गो. वळवी )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मलबार हिल, मुंबई.
२) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
५) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
६) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, बीड.

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
१०) नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
११) वित्त विभाग (व्यय १५, अर्थसं १६, अर्थसं १७) मंत्रालय,मुंबई ३२.
१२) कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (का.यो-११), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.